आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात सर्वसाधारण शिक्षण या मुख्य शीर्षांतर्गत निधी वितरण (लेखाशीर्ष २२०२ १९०१, २२०२ १९४८ व २२०२ एच ९७३-वेतन)

**महाराष्ट्र शासन.**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२२/प्र.क्र.०४/का-६.**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ६ मे,२०२२.

**वाचा –**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३ /अर्थ-३, दि.०४.०४.२०२२.
२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, समक्रमांक, दि.११.०४.२०२२.
३) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाची नस्ती क्र.अनुवि-४९२२/ प्र.क्र.३४/ अर्थसंकल्प.

**प्रस्तावना:-**

"महाराष्ट्र विनियोजन विधेयक,२०२२" यास विधानमंडळाने मंजुरी दिलेली असुन महाराष्ट्राचे राज्यपाल यांनी त्यास अधिसंमती दिलेली आहे. त्यानुषंगाने वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन परिपत्रकान्वये वित्त विभागामार्फत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण (BEAMS) वितरण प्रणालीवर वेतन या उद्दीष्टाकरीता अर्थसंकल्पित तरतूदींच्या २५ % इतका निधी वितरणासाठी उपलब्ध करुन दिलेला आहे. यास अनुसरून आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत शालेय शिक्षण विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या योजनांतर्गत ३६- सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टाकरीता अर्थसंकल्पित तरतूदीच्या १०% निधी संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये शालेय शिक्षण विभागास वितरीत करण्यात आला आहे. आता वितरणासाठी उपलब्ध मर्यादेतील उर्वरीत १५ % निधी वितरीत करण्याबाबत सं.क्र.३ येथील प्रस्तावास अनुसरून शालेय शिक्षण विभागास निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

आदिवासी घटक कार्यक्रमातंर्गत सन २०२२-२३ अंतर्गत मागणी क्र.टी-५ मधील **२२०२-सर्वसाधारण शिक्षण** या मुख्य लेखाशिर्षांतर्गत वित्त विभागाने वितरणाकरीता उपलब्ध करून दिल्याप्रमाणे वेतनासाठी वार्षिक अर्थसंकल्पीत तरतूदींच्या १० टक्के मर्यादेतील वितरीत तरतूद विचारात घेऊन खालीलप्रमाणे उर्वरीत १५ % एकूण रू.१५६३.४४७५ लाख इतका निधी प्रशासकिय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग,मंत्रालय, मुंबई यांना वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(रु. लाखात)

| अ. क्र. | योजनेचे नाव | अर्थसंकल्पित तरतूद सन २०२२-२३ | सदर शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | सर्वसाधारण माध्यमिक शाळांना सहायक अनुदान (२२०२ १९०१)- ३६ सहाय्यक अनुदाने (वेतन) | ७५००.०० | ११२५.०० |

| अ. क्र. | योजनेचे नाव | अर्थसंकल्पित तरतूद सन २०२२-२३ | सदर शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| २ | अशासकीय कनिष्ठ महाविद्यालयांना सहायक अनुदान (२२०२ १९४८ ) - ३६ सहाय्यक अनुदाने (वेतन) | ४२२.९५ | ६३.४४७५ |
| ३ | सैनिक शाळेमधील आदिवासी विद्यार्थ्यांच्या तुकडीला सहाय्य (२२०२ एच ९७३) - ३६ सहाय्यक अनुदाने (वेतन) | २५००.०० | ३७५.०० |
| **एकुण** | | **१०४२२.९५** | **१५६३.४४७५** |

२. सदर निधी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. सदर वितरीत निधी खर्च करतांना संबंधित नियंत्रक अधिकारी यांनी राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिकेमधील व संदर्भाधीन क्र.१ येथील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकातील तरतूदी व सर्व अटींचे पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागामार्फत अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या निधी मर्यादेत व संदर्भाधिन दि.०४.०४.२०२२ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकिय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०५०६१६५२२४४५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

KIRAN KISANRAO PAWAR

Digitally signed by KIRAN KISANRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, pseudonym=4D88F77C99929CC895AC64CF186BB11E7252442D, serialNumber=344DE3FF07B9439DD11CAF728255A5EB0A0DD495EF82F989931088637D8211C0, cn=KIRAN KISANRAO PAWAR
Date: 2022.05.06 17:08:43 +05'30'

**(किरण कि.पवार )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री,आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/ नागपूर/ अमरावती.
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. वित्त विभाग (अर्थ-१९ / व्यय-१४ ) मंत्रालय, मुंबई-३२
१०. निवडनस्ती, कार्यासन- ०६, आदिवासी विकास विभाग.